वसई- विरार महानगर पालिका सार्वत्रिक निवडणूक २०१५ महानगर पालिका मधील पोटनिवडणूकीकरिता व इतर त्या त्या क्षेत्रातील दुकाने,आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे,व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापनां तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि आस्थापनांमध्ये कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी अथवा दोन तासांची सवलत देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः- मतदान-२०१५/प्र.क्र.८५/कामगार-९
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १० जून, २०१५

संदर्भ : -राज्य निवडणूक आयोगाचे क्रमांक रानिआ/मनवा/ २०१५/प्र.क्र.१२ दि.१६.५.२०१५ रोजीचेचपत्र

## परिपत्रक

राज्य निवडणूक आयोगाने वसई-विरार महानगरपालिका मतदार संघातील सार्वत्रिकनिवडणूका रविवार, दिनांक १४ जून,२०१५ तसेच अहमदनगर उल्हासनगर मिराभाईंदर,मालेगाव, सोलापूर या महानगरपालिकेतील रिक्त झालेल्या पदांच्या पोटनिवडणूका दि १४.६.२०१५ रोजी घेण्याचे ठरविले आहे.

२. त्यानुसार उपरोक्त २ मतदान क्षेत्रातील मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्याची योग्य संधी प्राप्त करुन देण्याच्या दृष्टीने या क्षेत्रात कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी भरपगारी सुट्टी / अथवा कामाच्या तासामधून मतदान करण्याकरिता दोन तासांची सवलत देण्याबाबत योग्य ते निदेश सर्व संबंधितांना तात्काळ देण्याबाबत संदर्भ क्रमांक (१) येथील पत्रान्वये राज्य निवडणूक आयोगाने कळविले आहे.

३. लोकप्रतिनिधीत्व अधिनियम,१९५१ मधील नियम १३५ (ब) नुसार महाराष्ट्रातील वसई-विरार मतदार संघातील सारर्वत्रिक निवडणूक कार्यक्रम २०१५ च्या व तसेच अहमदनगर उल्हासनगर मिराभाईंदर,मालेगाव, सोलापूर या महानगरपालिकेतील रिक्त झालेल्या पदांच्या पोटनिवडणूका सर्व पोटनिवडणुकीच्या पार्श्वभूमीवर या क्षेत्रातील विविध आस्थापना, दुकाने आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापनां तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि आस्थापनां यांना सूचना देण्यात येत आहेत की,या विधानसभा क्षेत्रात शनिवार दि.१४ जून२०१५ रोजी सर्व दुकाने, आस्थापना,

निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम, इतर आस्थापनां तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि आस्थापनातील कामगारांना सदर निवडणुकीच्या दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भरपगारी सुट्टी अथवा कामाच्या तासामधून मतदान करण्याकरिता दोन तासांची सवलत देण्यात यावी.

४. लोकप्रतिनिधीत्व अधिनियम,१९५१ मधील नियम १३५ (ब)४ नुसार मतदानाच्या दिवशी कामगारांच्या अनुपस्थितीमुळे धोका अथवा मोठया प्रमाणावर नुकसान हाईल अशा आस्थापनेतील/उद्योगातील कामगार मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी संपूर्ण दिवसाची सुट्टी देता येणे शक्य नसल्यास अशा आस्थापनेतील / उद्योगांतील कामगारांना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या , निर्यात व्यवसायात असलेल्या कंपन्या, कायम / अखंडीत उत्पादन सुरु असलेल्या कंपन्यामधील कामगारांना मतदानाचा हक्क बजावता येईल अशा पुरेशा वेळेची सवलत देण्यात यावी.

५. सदर परिपत्रक राज्य निवडणूक आयोगाच्या पत्र क्र.रानिआ २०१५/मनपा-२०१५/प्र.क्र.१२/का-५ दि.२९.५.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०६१०१६५९३४६९१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha M Bharose
Date: 2015.06.10 17:01:44 +05'30'

**( व. मुं. भरोसे )**

**उप सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत** - उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधित आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित:-

१. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मंत्रालय मंबई -३२.

२. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

३. अवर सचिव (कार्यासन-५), राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकिय भवन, मुंबई-३२.

४. कामगार आयुक्त, बांद्रा, मुंबई.

५.संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, बांद्रा, मुंबई.

६.संचालक, बाष्पके, संचालनालय, बांद्रा, मुंबई.

७.जिल्हाधिकारी, मुबई उपनगर जिल्हा.

८.जिल्हाधिकारी, पालघर

९.आयुक्त, वसई —विरार/अहमदनगर/उल्हासनगर/मिरा-भाईंदर/मालेगाव/ सोलापूर/ ठाणे महानगर पालिका.

१०. कामगार प्रभागाच्या अधिपत्त्याखालील सर्व कार्यालये / मंडळे इत्यादी.

११.महासंचालक,माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

१२.कामगार विभागातील सर्व कार्यासने

१३.निवडनस्ती (कामगार-९)

**प्रत माहितीसाठी :-**

१.मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई

२.मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई

३.मा.मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई